## महाराष्ट्र शासन

**क्रमांक:- संकीर्ण-०३२३/ प्र.क्र.१२०/१३स,**
**सहकार, पणन व वस्त्रोद्यो ग विभाग,**
मंत्रालय, विस्तार इमारत,
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ०९ जून, २०२३

**संदर्भ**:- १. श्री. समरजितसिंह घाटगे यांचे दिनांक २४.०५.२०२३ रोजीचे पत्र.
२.राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र.रासनिप्रा/ कक्ष-११/ आजरा स.सा.का.कागल/ निवडणूक / ४१५०/२०२३, दिनांक ३०.०५.२०२३ रोजीचे पत्र.

### आदेश

ज्याअर्थी, आजरा शेतकरी सहकारी साखर कारखाना लि.गवसे, ता.आजरा, जि.कोल्हापूर या साखर कारखान्याच्या संचालक मंडळाची मुदत दिनांक २३.०५.२०२३ रोजी संपुष्टात आलेली असणे, प्राधिकरणाने दिनांक १५.०२.२०२३ रोजीच्या आदेशान्वये दिनांक ०१.०४.२०२१ ते दिनांक ३१.१२.२०२२ या कालावधीतील निवडणुकीस पात्र सहकारी संस्थांच्या निवडणूका व ई-१ सन २०२३ मधील दिनांक ०१.०१.२०२३ ते दिनांक ३१.१२.२०२३ या कालावधीतील निवडणूकीस पात्र अ, ब, क व ड वर्गातील सहकारी संस्थांच्या निवडणूक प्रक्रिया संचालक मंडळाची मुदत संपण्यापूर्वी अनुक्रमे १५०, १२०, ६० व ६० दिवस अगोदर सुरू करणेबाबत व सदर संस्थांच्या मतदार याद्या तयार करण्याकरीता संचालक मंडळाची मुदत संपल्याचा दिनांक हा अर्हता दिनांक म्हणून समजण्याबाबत जिल्हा सहकारी निवडणूक अधिकारी यांना आदेशीत केलेले असणे, त्यानुसार जिल्हा सहकारी निवडणूक अधिकारी तथा प्रादेशिक सहसंचालक (साखर), कोल्हापूर यांनी आजरा शेतकरी सहकारी साखर कारखाना लि.गवसे, ता.आजरा, जि.कोल्हापूर या कारखान्याच्या निवडणूकीकरीता प्रारूप मतदार यादी व अंतिम मतदार यादी अनुक्रमे दिनांक ०२.०५.२०२३ व दिनांक २५.०५.२०२३ रोजी प्रसिद्ध केलेली असणे, आजरा शेतकरी सहकारी साखर कारखाना लि.गवसे, ता.आजरा, जि.कोल्हापूर या कारखान्याच्या निवडणूकीकरीता अंतिम मतदार यादी दिनांक २५.०५.२०२३ रोजी प्रसिद्ध झालेली असणे, त्यामुळे उक्त कारखान्याचा निवडणूक कार्यक्रम ०४.०६.२०२३ ते दिनांक १२.०६.२०२३ या कालावधीत सुरू होणे, तसेच उक्त साखर कारखान्याच्या मतदानाची संभाव्य तारीख ही १२.०७.२०२३ ते १९.०७.२०२३ या दरम्यान असणे,

ज्याअर्थी, सदर साखर कारखान्याच्या मतदानाचा कालावधी १२ जुलै,२०२३ ते १९ जुलै,२०२३ या दरम्यान असल्याची बाब विचाराधीन घेवून आजरा शेतकरी सहकारी साखर कारखाना लि.गवसे, ता.आजरा, जि.कोल्हापूर या साखर कारखान्याचे कार्यक्षेत्र हे आजरा व चंदगड तालुक्याचे असून, जे महाराष्ट्राच्या पश्चिम भागातील व कोकण प्रदेशाला लागून (अंबोली

घाटाजवळ) असणे, ज्याठिकाणी जून महिन्यापासून प्रचंड प्रमाणात पाऊस पडत असणे, त्याचप्रमाणे पाऊस सूरू झालेपासून खरीप पिकांचे लागणीकरीता शेतकरी सभासद जून व जुलै अखेर पर्यंत साधारण दोन महिने पुर्णपणे व्यस्त असणे, तसेच पावसाच्या परिस्थितीमध्ये पुनर्नियोजन व अन्य कारणांनी शासकीय अधिकारी व यंत्रणा व्यस्त असणे, अशा परिस्थितीत सदर कारखान्याची निवडणूक प्रक्रिया राबविणे सभासद व मतदार त्याचबरोबर निवडणूक यंत्रणेच्यादृष्टीने सोईचे नसणे,

त्याअर्थी, कोल्हापूर जिल्ह्यातील आजरा शेतकरी सहकारी साखर कारखाना लि.गवसे, ता.आजरा, जि.कोल्हापूर या कारखान्याच्या परिसरामध्ये मान्सून पाऊस फार प्रचंड पडणे, त्यामुळे, उद्भवणारी नैसर्गिक आपत्ती, त्याच बरोबर पाऊस सुरू झालेपासून खरीप पिकांचे लावणीकरिता शेतकरी सभासद जून व जुलै अखेरपर्यंत साधारण दोन महिने पुर्णपणे व्यस्त असणे, तसेच, पावसाच्या परिस्थितीमध्ये पुनर्नियोजन व अन्य कारणांनी शासकीय अधिकारी व यंत्रणा या कालावधीत व्यस्त असणे, त्यामुळे अशा परिस्थितीत सदर साखर कारखान्याचा निवडणूक कार्यक्रम जाहिर झाल्यास अनेक अडचणी उद्भवू शकतात, त्यामुळे, सदर कारखान्याच्या परिसरातील भौगोलीक परिस्थिती विचारात घेता महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६० मधील कलम १५७ अन्वये शासनास प्राप्त असलेल्या अधिकारात कलम ७३कक मधील तरतूदीला सुट देऊन आजरा शेतकरी सहकारी साखर कारखाना लि.गवसे, ता.आजरा, जि.कोल्हापूर या साखर कारखान्याची निवडणूक प्रक्रिया ज्या टप्प्यावर असेल त्या टप्प्यावर या आदेशाच्या दिनांकापासून दिनांक ३०.०९.२०२३ पर्यंत पुढे ढकलण्यात येत आहे.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२३०६०९१२४९०११२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL JAYRAM CHAUDHRY

Digitally signed by ANIL JAYRAM CHAUDHRY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D124AE9BBD15BED87DBD08EF779CF1B85A4020339EB1C2EF0E112FB67063011C, cn=ANIL JAYRAM CHAUDHRY
Date: 2023.06.09 12:50:12 +05'30'

**(अनिल ज.चौधरी)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.

३. सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

४. विभागीय सहनिबंधक / जिल्हा उपनिबंधक/ उपनिबंधक, सहकारी संस्था कोल्हापूर.

५. निवडनस्ती कार्यासन १३-स.